<u>प्रकरणे सादर करावयाचे टप्पे निश्चित करण्याबाबत....</u>

**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: संकीर्ण-प्रसाक-२०११/प्र.क्र.१६२/का.४अे
कृषि, पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास व
मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :- २ जुलै, २०११

वाचा :- १) क्र.रवका -१०९८/प्र.क्र.३६०/प्रशासन-१,दि.३० जाने १९९९ चे पत्र.
२) कृषि व पदुम विभाग यांचे पत्र क्र.कृपवि-३५११/प्र.क्र.३६३/
प्रशासन - १,दिनांक ४ मे,२०११

**<u>कार्यालयीन आदेश</u>**

सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्र.मुसका-२०११/५४/कार्यासन-१ दिनांक ११.२.२०११ अन्वये तसेच उपरोक्त संदर्भाधिन कार्यालयीन आदेशान्वये शासकीय कार्यालयामध्ये कामकाजात गतीमानता आणण्यासाठी व प्रलंबित प्रकरणांचा निपटारा होण्याच्या दृष्टीने अधिकाऱ्यांचे स्तर निर्धारीत करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. शासकीय कार्यालयामध्ये कामकाजात गतिमानता आणण्यासाठी या कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निदेश असल्यास किंवा काही अपवादात्मक परिस्थितीत त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

२. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक **२०११०७०५१४५८०५००१** हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि.मा.बिवलकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सहसचिव / उपसचिव (कृषि व फलोत्पादन प्रभाग) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सचिव (पदुम ) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
कृषि व पदुम विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती - ४ अे

| कार्यासन | मुख्य विषय | संबंधित उपविषय | सादरीकरणाचे टप्पे | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम अधिकारी |
|---|---|---|---|---|
| ४ अे | १) सर्व पीक संवर्धन विषयक केंद्र व राज्य पुरस्कृत योजना (विघयो व आदिवासी उपयोजनेसह ) | १)कृति आराखड्या अंतर्गत एकात्मिक तृणधान्य विकास योजना | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |
| | | २) कृति आराखड्या अंतर्गत ऊस विकास योजना | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव /सचिव | सचिव |
| | | ३) कृति आराखड्या अंतर्गत १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना. | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |
| | | ४) केंद्र पुरस्कृत कापूस तंत्रज्ञान अभियान योजना | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव /सचिव | सचिव |
| | | ५) केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीत धान्य, मका व तेलताड विकास कार्यक्रम | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |
| | | ६)विशेष घटक योजना, या अंतर्गत अनुसूचित जाती /नवबौध्दशेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |
| | | ७)आदिवासी उपयोजना, याअंतर्गत आदिवासी क्षेत्रातील /क्षेत्राबाहेरील आदिवासी शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना. | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |
| | २)केंद्रपुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजना | ८) केंद पुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजना | कक्ष अधिकारी/ अवर सचिव/ उपसचिव /सचिव | सचिव |
| | ३)किडरोगसर्वेक्षणव नियंत्रण सल्ला प्रकल्प | ९) किडरोग सर्वेक्षण व नियंत्रण सल्ला प्रकल्प | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव/ /सचिव | सचिव |
| | ४) राष्ट्रीय कृषि योजनेअंतर्गत, कोरडवाहू क्षेत्रातील कडधान्य व गळीतधान्य यांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याकरिता कृषि यांत्रिकीकरणाची विशेष मोहिम | १०) राष्ट्रीय कृषि योजनेअंतर्गत, कोरडवाहू क्षेत्रातील कडधान्य व गळीतधान्य यांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याकरिता कृषि यांत्रिकीकरणाची विशेष मोहिम | कक्ष अधिकारी / अवर सचिव / उपसचिव / सचिव | सचिव |